तंव सर्वज्ञांचा रावो । म्हणे जाणौनि तयाचा भावो ।
परिसें ज्ञेयाचा अभिप्रावो । सांगों आतां ॥ ८६४ ॥

ज्ञेयं यत्तत्प्रवक्ष्यामि यज्ज्ञात्वा~मृतमश्नुते ॥
अनादिमत्परं ब्रह्म न सत्तन्नासदुच्यते ॥ १२॥

तरि ज्ञेय ऐसें म्हणणें । वस्तूतें येणेंचि कारणें ।
जें ज्ञानेंवांचूनि कवणें । उपायें नये ॥ ८६५ ॥
आणि जाणितलेयावरौतें । कांहींच करणें नाहीं जेथें ।
जाणणेंचि तन्मयातें । आणी जयाचें ॥ ८६६ ॥
जें जाणितलेयासाठीं । संसार काढूनियां कांठीं ।
जिरोनि जाइजे पोटीं । नित्यानंदाच्या ॥ ८६७ ॥
तें ज्ञेय गा ऐसें । आदि जया नसे ।
परब्रह्म आपैसें । नाम जया ॥ ८६८ ॥
जें नाहीं म्हणों जाइजे । तंव विश्वाकारें देखिजे ।
आणि विश्वचि ऐसें म्हणिजे । तरि हे माया ॥ ८६९ ॥
रूप वर्ण व्यक्ती । नाहीं दृश्य दृष्टा स्थिती ।
तरी कोणें कैसें आथी । म्हणावें पां ॥ ८७० ॥
आणि साचचि जरी नाहीं । तरी महदादि कोणें ठाईं ।
स्फुरत कैचें काई । तेणेंवीण असे ? ॥ ८७१ ॥
म्हणौनि आथी नाथी हे बोली । जें देखोनि मुकी जाहली ।
विचारेंसीं मोडली । वाट जेथें ॥ ८७२ ॥
जैसी भांडघटशरावीं । तदाकारें असे पृथ्वी ।
तैसें सर्व होऊनियां सर्वीं । असे जे वस्तु ॥ ८७३ ॥

सर्वतः पाणिपादं तत्सर्वतो~क्षिशिरोमुखम् ।
सर्वतः श्रुतिमल्लोके सर्वमावृत्य तिष्ठति ॥ १३॥

आघवांचि देशीं काळीं । नव्हतां देशकाळांवेगळी ।
जे क्रिया स्थूळास्थूळीं । तेचि हात जयाचे ॥ ८७४ ॥
तयातें याकारणें । विश्वबाहू ऐसें म्हणणें ।
जें सर्वचि सर्वपणें । सर्वदा करी ॥ ८७५ ॥
आणि समस्तांही ठाया । एके काळीं धनंजया ।
आलें असे म्हणौनि जया । विश्वांघ्रीनाम ॥ ८७६ ॥
पैं सवितया आंग डोळे । नाहींत वेगळे वेगळे ।
तैसें सर्वद्रष्टे सकळें । स्वरूपें जें ॥ ८७७ ॥
म्हणौनि विश्वतश्चक्षु । हा अचक्षूच्या ठायीं पक्षु ।
बोलावया दक्षु । जाहला वेदु ॥ ८७८ ॥
जें सर्वांचे शिरावरी । नित्य नांदे सर्वांपरी ।
ऐसिये स्थितीवरी । विश्वमूर्धा म्हणिपे ॥ ८७९ ॥
पैं गा मूर्ति तेंचि मुख । हुताशना जैसें देख ।
तैसें सर्वपणें अशेख । भोक्ते जे ॥ ८८० ॥
यालागीं तया पार्था । विश्वतोमुख हे व्यवस्था ।
आली वाक्पथा । श्रुतीचिया ॥ ८८१ ॥
आणि वस्तुमात्रीं गगन । जैसें असे संलग्न ।

तैसें शब्दजातीं कान । सर्वत्र जया ॥ ८८२ ॥
म्हणौनि आम्हीं तयातें । म्हणों सर्वत्र आइकतें ।
एवं जें सर्वांतें । आवरूनि असे ॥ ८८३ ॥
एऱ्हवीं तरी महामती । विश्वतश्चक्षु इया श्रुती ।
तयाचिया व्याप्ती । रूप केलें ॥ ८८४ ॥
वांचूनि हस्त नेत्र पाये । हें भाष तेथ कें आहे ? ।
सर्व शून्याचा न साहे । निष्कर्षु जें ॥ ८८५ ॥
पैं कल्लोळातें कल्लोळें । ग्रसिजत असे ऐसें कळे ।
परी ग्रसितें ग्रासावेगळें । असे काई ? ॥ ८८६ ॥
तैसें साचचि जें एक । तेथ कें व्याप्यव्यापक ? ।
परी बोलावया नावेक । करावें लागे ॥ ८८७ ॥
पैं शून्य जैं दावावें जाहलें । तैं बिंदुलें एक पाहिजे केलें ।
तैसें अद्वैत सांगावें बोलें । तैं द्वैत कीजे ॥ ८८८ ॥
एऱ्हवीं तरी पार्था । गुरुशिष्यसत्पथा ।
आडळु पडे सर्वथा । बोल खुंटे ॥ ८८९ ॥
म्हणौनि गा श्रुती । द्वैतभावें अद्वैतीं ।
निरूपणाची वाहती । वाट केली ॥ ८९० ॥
तेंचि आतां अवधारीं । इये नेत्रगोचरें आकारीं ।
तें ज्ञेय जयापरी । व्यापक असे ॥ ८९१ ॥

सर्वेन्द्रियगुणाभासं सर्वेन्द्रियविवर्जितम् ।
असक्तं सर्वभृच्चैव निर्गुणं गुणभोक्तृ च ॥ १४॥

तरी तें गा किरीटी ऐसें । अवकाशीं आकाश जैसें ।
पटीं पटु होऊनि असे । तंतु जेवीं ॥ ८९२ ॥
उदक होऊनि उदकीं । रसु जैसा अवलोकीं ।
दीपपणें दीपकीं । तेज जैसें ॥ ८९३ ॥
कर्पूरत्वें कापुरीं । सौरभ्य असे जयापरी ।
शरीर होऊनि शरीरीं । कर्म जेवीं ॥ ८९४ ॥
किंबहुना पांडवा । सोनेंचि सोनयाचा रवा ।
तैसें जें या सर्वां । सर्वांगीं असे ॥ ८९५ ॥
परी रवेपणामाजिवडे । तंव रवा ऐसें आवडे ।
वांचूनि सोनें सांगडें । सोनया जेवीं ॥ ८९६ ॥
पैं गा वोघुचि वांकुडा । परि पाणी उजू सुहाडा ।
वन्हि आला लोखंडा । लोह नव्हे कीं ॥ ८९७ ॥
घटाकारें वेंटाळें । तेथ नभ गमे वाटोळें ।
मठीं तरी चौफळें । आये दिसे ॥ ८९८ ॥
तरि ते अवकाश जैसें । नोहिजतीचि कां आकाशें ।
जें विकार होऊनि तैसें । विकारी नोहे ॥ ८९९ ॥
मन मुख्य इंद्रियां । सत्त्वादि गुणां ययां- ।
सारिखें ऐसें धनंजया । आवडे कीर ॥ ९०० ॥
पैं गुळाची गोडी । नोहे बांधया सांगडी ।
तैसीं गुण इंद्रियें फुडीं । नाहीं तेथ ॥ ९०१ ॥
अगा क्षीराचिये दशे । घृत क्षीराकारें असे ।
परी क्षीरचि नोहे जैसें । कपिध्वजा ॥ ९०२ ॥
तैसें जें इये विकारीं । विकार नोहे अवधारीं ।
पैं आकारा नाम भोंवरी । येर सोने तें सोनें ॥ ९०३ ॥

इया उघड मऱ्हाटिया । तें वेगळेपण धनंजया ।
जाण गुण इंद्रियां- । पासोनियां ॥ ९०४ ॥
नामरूपसंबंधु । जातिक्रियाभेदु ।
हा आकारासीच प्रवादु । वस्तूसि नाहीं ॥ ९०५ ॥
तें गुण नव्हे कहीं । गुणा तया संबंधु नाहीं ।
परी तयाच्याचि ठायीं । आभासती ॥ ९०६ ॥
येतुलेयासाठीं । संभ्रांताच्या पोटीं ।
ऐसें जाय किरीटी । जे हेंचि धरी ॥ ९०७ ॥
तरी तें गा धरणें ऐसें । अभ्रातें जेवीं आकाशें ।
कां प्रतिवदन जैसें । आरसेनी ॥ ९०८ ॥
नातरी सूर्य प्रतिमंडल । जैसेनि धरी सलिल ।
कां रश्मिकरीं मृगजळ । धरिजे जेवीं ॥ ९०९ ॥
तैसें गा संबंधेंवीण । यया सर्वांतें धरी निर्गुण ।
परी तें वायां जाण । मिथ्यादृष्टी ॥ ९१० ॥
आणि यापरी निर्गुणें । गुणातें भोगणें ।
रंका राज्य करणें । स्वप्नीं जैसें ॥ ९११ ॥
म्हणौनि गुणाचा संगु । अथवा गुणभोगु ।
हा निर्गुणीं लागु । बोलों नये ॥ ९१२ ॥

बहिरन्तश्च भूतानामचरं चरमेव च ।
सूक्ष्मत्वात्तदविज्ञेयं दूरस्थं चान्तिके च तत् ॥ १५॥

जें चराचर भूतां- । माजीं असे पंडुसुता ।
नाना वन्हीं उष्णता । अभेदें जैसी ॥ ९१३ ॥
तैसेनि अविनाशभावें । जें सूक्ष्मदशे आघवें ।
व्यापूनि असे तें जाणावें । ज्ञेय एथ ॥ ९१४ ॥
जें एक आंतुबाहेरी । जें एक जवळ दुरी ।
जें एकवांचूनि परी । दुजीं नाहीं ॥ ९१५ ॥
क्षीरसागरींची गोडी । माजीं बहु थडिये थोडी ।
हें नाहीं तया परवडी । पूर्ण जें गा ॥ ९१६ ॥
स्वेदजादिप्रभृती । वेगळाल्यां भूतीं ।
जयाचिये अनुस्यूतीं । खोमणें नाहीं ॥ ९१७ ॥
पैं श्रोते मुखटिळका । घटसहस्रा अनेकां- ।
माजीं बिंबोनि चंद्रिका । न भेदे जेवीं ॥ ९१८ ॥
नाना लवणकणाचिये राशी । क्षारता एकचि जैसी ।
कां कोडी एकीं ऊसीं । एकचि गोडी ॥ ९१९ ॥

अविभक्तं च भूतेषु विभक्तमिव च स्थितं ।
भूतभर्तृ च तज्ज्ञेयं ग्रसिष्णु प्रभविष्णु च ॥ १६॥

तैसें अनेकीं भूतजातीं । जें आहे एकी व्याप्ती ।
विश्वकार्या सुमती । कारण जें गा ॥ ९२० ॥
म्हणौनि हा भूताकारु । जेथोनि तेंचि तया आधारु ।
कल्लोळा सागरु । जियापरी ॥ ९२१ ॥
बाल्यादि तिन्हीं वयसीं । काया एकचि जैसी ।

तैसें आदिस्थितिग्रासीं । अखंड जें ॥ ९२२ ॥
सायंप्रातर्मध्यान । होतां जातां दिनमान ।
जैसें कां गगन । पालटेना ॥ ९२३ ॥
अगा सृष्टिवेळे प्रियोत्तमा । जया नांव म्हणती ब्रह्मा ।
व्याप्ति जें विष्णुनामा । पात्र जाहलें ॥ ९२४ ॥
मग आकारु हा हारपे । तेव्हां रुद्र जें म्हणिपे ।
तेंही गुणत्रय जेव्हां लोपे । तैं जें शून्य ॥ ९२५ ॥
नभाचें शून्यत्व गिळून । गुणत्रयातें नुरऊन ।
तें शून्य तें महाशून्य । श्रुतिवचनसंमत ॥ ९२६ ॥

ज्योतिषामपि तज्ज्योतिस्तमसः परमुच्यते ।
ज्ञानं ज्ञेयं ज्ञानगम्यं हृदि सर्वस्य विस्ठितम् ॥ १७॥

जें अग्नीचें दीपन । जें चंद्राचें जीवन ।
सूर्याचे नयन । देखती जेणें ॥ ९२७ ॥
जयाचेनि उजियेडें । तारांगण उभडे ।
महातेज सुरवाडें । राहाटे जेणें ॥ ९२८ ॥
जें आदीची आदी । जें वृद्धीची वृद्धी ।
बुद्धीची जे बुद्धी । जीवाचा जीवु ॥ ९२९ ॥
जें मनाचें मन । जें नेत्राचे नयन ।
कानाचे कान । वाचेची वाचा ॥ ९३० ॥
जें प्राणाचा प्राण । जें गतीचे चरण ।
क्रियेचें कर्तेपण । जयाचेनि ॥ ९३१ ॥
आकारु जेणें आकारे । विस्तारु जेणें विस्तारे ।
संहारु जेणें संहारे । पंडुकुमरा ॥ ९३२ ॥
जें मेदिनीची मेदिनी । जें पाणी पिऊनि असे पाणी ।
तेजा दिवेलावणी । जेणें तेजें ॥ ९३३ ॥
जें वायूचा श्वासोश्वासु । जें गगनाचा अवकाशु ।
हें असो आघवाची आभासु । आभासे जेणें ॥ ९३४ ॥
किंबहुना पांडवा । जें आघवेंचि असे आघवा ।
जेथ नाहीं रिगावा । द्वैतभावासी ॥ ९३५ ॥
जें देखिलियाचिसवें । दृश्य द्रष्टा हें आघवें ।
एकवाट कालवे । सामरस्यें ॥ ९३६ ॥
मग तेंचि होय ज्ञान । ज्ञाता ज्ञेय हन ।
ज्ञानें गमिजे स्थान । तेंहि तेंची ॥ ९३७ ॥
जैसें सरलियां लेख । आंख होती एक ।
तैसें साध्यसाधनादिक । ऐक्यासि ये ॥ ९३८ ॥
अर्जुना जिये ठायीं । न सरे द्वैताची वही ।
हें असो जें हृदयीं । सर्वांच्या असे ॥ ९३९ ॥

इति क्षेत्रं तथा ज्ञानं ज्ञेयं चोक्तं समासतः ।
मद्भक्त एतद्विज्ञाय मद्भावायोपपद्यते ॥ १८॥

एवं तुजपुढां । आदीं क्षेत्र सुहाडा ।
दाविलें फाडोवाडां । विवंचुनी ॥ ९४० ॥

तैसेंचि क्षेत्रापाठीं । जैसेनि देखसी दिठी ।
तें ज्ञानही किरीटी । सांगितलें ॥ ९४१ ॥
अज्ञानाही कौतुकें । रूप केलें निकें ।
जंव आयणी तुझी टेंके । पुरे म्हणे ॥ ९४२ ॥
आणि आतां हें रोकडें । उपपत्तीचेनि पवाडें ।
निरूपिलें उघडें । ज्ञेय पैं गा ॥ ९४३ ॥
हे आघवीच विवंचना । बुद्धी भरोनि अर्जुना ।
मत्सिद्धिभावना । माझिया येती ॥ ९४४ ॥
देहादि परिग्रहीं । संन्यासु करूनियां जिहीं ।
जीवु माझ्या ठाईं । वृत्तिकु केला ॥ ९४५ ॥
ते मातें किरीटी । हेंचि जाणौनियां शेवटीं ।
आपणपयां साटोवाटीं । मीचि होती ॥ ९४६ ॥
मीचि होती परी । हे मुख्य गा अवधारीं ।
सोहोपी सर्वांपरी । रचिलीं आम्हीं ॥ ९४७ ॥
कडां पायरी कीजे । निराळीं माचु बांधिजे ।
अथावीं सुइजे । तरी जैसी ॥ ९४८ ॥
एऱ्हवीं अवघेंचि आत्मा । हें सांगों जरी वीरोत्तमा ।
परी तुझिया मनोधर्मा । मिळेल ना ॥ ९४९ ॥
म्हणौनि एकचि संचलें । चतुर्धा आम्हीं केलें ।
जें अदळपण देखिलें । तुझिये प्रज्ञे ॥ ९५० ॥
पैं बाळ जैं जेवविजे । तैं घांसु विसा ठायीं कीजे ।
तैसें एकचि हेंचतुर्व्याजें । कथिलें आम्हीं ॥ ९५१ ॥
एक क्षेत्र एक ज्ञान । एक ज्ञेय एक अज्ञान ।
हे भाग केले अवधान । जाणौनि तुझें ॥ ९५२ ॥
आणि ऐसेनही पार्था । जरी हा अभिप्रावो तुज हाता ।
नये तरी हे व्यवस्था । एक वेळ सांगों ॥ ९५३ ॥
आतां चौठायीं न करूं । एकही म्हणौनि न सरूं ।
आत्मानात्मया धरूं । सरिसा पाडु ॥ ९५४ ॥
परि तुवां येतुलें करावें । मागों तें आम्हां देआवें ।
जे कानचि नांव ठेवावें । आपण पैं गा ॥ ९५५ ॥
या श्रीकृष्णाचिया बोला । पार्थु रोमांचितु जाहला ।
तेथ देवो म्हणती भला । उचंबळेना ॥ ९५६ ॥
ऐसेनि तो येतां वेगु । धरूनि म्हणे श्रीरंगु ।
प्रकृतिपुरुषविभागु । परिसें सांगों ॥ ९५७ ॥

प्रकृतिं पुरुषं चैव विद्ध्यनादी उभावपि ।
विकारांश्च गुणांश्चैव विद्धि प्रकृतिसंभवान् ॥ १९॥

जया मार्गातें जगीं । सांख्य म्हणती योगी ।
जयाचिये भाटिवेलागीं । मी कपिल जाहलों ॥ ९५८ ॥
तो आइक निर्दोखु । प्रकृतिपुरुषविवेकु ।
म्हणे आदिपुरुखु । अर्जुनातें ॥ ९५९ ॥
तरी पुरुष अनादि आथी । आणि तैंचि लागोनि प्रकृति ।
संसरिसी दिवोराती । दोनी जैसी ॥ ९६० ॥
कां रूप नोहे वायां । परी रूपा लागली छाया ।
निकणु वाढे धनंजया । कणेंसीं कोंडा ॥ ९६१ ॥
तैसीं जाण जवटें । दोन्हीं इयें एकवटे ।

प्रकृतिपुरुष प्रगटें । अनादिसिद्धें ॥ ९६२ ॥
पैं क्षेत्र येणें नांवें । जें सांगितलें आघवें ।
तेंचि एथ जाणावें । प्रकृति हे गा ॥ ९६३ ॥
आणि क्षेत्रज्ञ ऐसें । जयातें म्हणितलें असे ।
तो पुरुष हें अनारिसे । न बोलों घेईं ॥ ९६४ ॥
इयें आनानें नांवें । परी निरूप्य आन नोहे ।
हें लक्षण न चुकावें । पुढतपुढती ॥ ९६५ ॥
तरी केवळ जे सत्ता । तो पुरुष गा पंडुसुता ।
प्रकृतीतें समस्तां । क्रिया नाम ॥ ९६६ ॥
बुद्धि इंद्रियें अंतःकरण । इत्यादि विकारभरण ।
आणि ते तिन्ही गुण । सत्त्वादिक ॥ ९६७ ॥
हा आघवाचि मेळावा । प्रकृती जाहला जाणावा ।
हेचि हेतु संभवा । कर्माचिया ॥ ९६८ ॥

कार्यकारणकर्तृत्वे हेतुः प्रकृतिरुच्यते ।
पुरुषः सुखदुःखानां भोक्तृत्वे हेतुरुच्यते ॥ २०॥

तेथ इच्छा आणि बुद्धि । घडवी अहंकारेंसीं आधीं ।
मग तिया लाविती वेधीं । कारणाच्या ॥ ९६९ ॥
तेंचि कारण ठाकावया । जें सूत्र धरणें उपाया ।
तया नांव धनंजया । कार्य पैं गा ॥ ९७० ॥
आणि इच्छा मदाच्या थावीं । लागली मनातें उठवी ।
तें इंद्रियें राहाटवी । हें कर्तृत्व पैं गा ॥ ९७१ ॥
म्हणौनि तीन्ही या जाणा । कार्यकर्तृत्वकारणा ।
प्रकृति मूळ हे राणा । सिद्धांचा म्हणे ॥ ९७२ ॥
एवं तिहींचेनि समवायें । प्रकृति कर्मरूप होये ।
परी जया गुणा वाढे त्राये । त्याचि सारिखी ॥ ९७३ ॥
जें सत्त्वगुणें अधिष्ठिजे । तें सत्कर्म म्हणिजे ।
रजोगुणें निफजे । मध्यम तें ॥ ९७४ ॥
जें कां केवळ तमें । होती जियें कर्में ।
निषिद्धें अधमें । जाण तियें ॥ ९७५ ॥
ऐसेनि संतासंतें । कर्में प्रकृतीस्तव होतें ।
तयापासोनि निर्वाळतें । सुखदुःख गा ॥ ९७६ ॥
असंतीं दुःख उपजे । सत्कर्मीं सुख निफजे ।
तया दोहींचा बोलिजे । भोगु पुरुषा ॥ ९७७ ॥
सुखदुःखें जंववरी । निफजती साचोकारीं ।
तंव प्रकृति उद्यमु करी । पुरुषु भोगी ॥ ९७८ ॥
प्रकृतिपुरुषांची कुळवाडी । सांगतां असंगडी ।
जे आंबुली जोडी । आंबुला खाय ॥ ९७९ ॥
आंबुला आंबुलिये । संगती ना सोये ।
कीं आंबुली जग विये । चोज ऐका ॥ ९८० ॥

पुरुषः प्रकृतिस्थो हि भुंक्ते प्रकृतिजान्गुणान् ।
कारणं गुण संगोऽस्य सदसद्योनिजन्मसु ॥ २१॥

जे अनंगु तो पेंधा । निकवडा नुसधा ।
जीर्णु अतिवृद्धा- । पासोनि वृद्धु ॥ ९८१ ॥
तया आडनांव पुरुषु । एऱ्हवीं स्त्री ना नपुंसकु ।
किंबहुना एकु । निश्चयो नाहीं ॥ ९८२ ॥
तो अचक्षु अश्रवणु । अहस्तु अचरणु ।
रूप ना वर्णु । नाम आथी ॥ ९८३ ॥
अर्जुना कांहींचि जेथ नाहीं । तो प्रकृतीचा भर्ता पाहीं ।
कीं भोगणें ऐसयाही । सुखदुःखांचें ॥ ९८४ ॥
तो तरी अकर्ता । उदासु अभोक्ता ।
परी इया पतिव्रता । भोगविजे ॥ ९८५ ॥
जियेतें अळुमाळु । रूपागुणाचा चाळढाळु ।
ते भलतैसाही खेळु । लेखा आणी ॥ ९८६ ॥
मा इये प्रकृती तंव । गुणमयी हेंचि नांव ।
किंबहुना सावेव । गुण तेचि हे ॥ ९८७ ॥
हे प्रतिक्षणीं नीत्य नवी । रूपा गुणाचीच आघवी ।
जडातेंही माजवी । इयेचा माजु ॥ ९८८ ॥
नामें इयें प्रसिद्धें । स्नेहो इया स्निग्धें ।
इंद्रियें प्रबुद्धें । इयेचेनि ॥ ९८९ ॥
कायि मन हें नपुंसक । कीं ते भोगवी तिन्ही लोक ।
ऐसें ऐसें अलौकिक । करणें इयेचें ॥ ९९० ॥
हे भ्रमाचे महाद्वीप । व्याप्तीचें रूप ।
विकार उमप । इया केले ॥ ९९१ ॥
हे कामाची मांडवी । हे मोहवनींची माधवी ।
इये प्रसिद्धचि दैवी । माया हे नाम ॥ ९९२ ॥
हे वाङ्मयाची वाढी । हे साकारपणाची जोडी ।
प्रपंचाची धाडी । अभंग हे ॥ ९९३ ॥
कळा एथुनि जालिया । विद्या इयेच्या केलिया ।
इच्छा ज्ञान क्रिया । वियाली हे ॥ ९९४ ॥
हे नादाची टांकसाळ । हे चमत्काराचें वेळाउळ ।
किंबहुना सकळ । खेळु इयेचा ॥ ९९५ ॥
जे उत्पत्ति प्रलयो होत । ते इयेचे सायंप्रात ।
हें असो अद्भुत । मोहन हे ॥ ९९६ ॥
हे अद्वयाचें दुसरें । हे निःसंगाचें सोयरे ।
निराळेंसि घरें । नांदत असे ॥ ९९७ ॥
इयेतें येतुलावरी । सौभाग्यव्याप्तीची थोरी ।
म्हणौनि तया आवरी । अनावरातें ॥ ९९८ ॥
तयाच्या तंव ठायीं । निपटूनि कांहींचि नाहीं ।
कीं तया आघवेहीं । आपणचि होय ॥ ९९९ ॥
तया स्वयंभाची संभूती । तया अमूर्ताची मूर्ती ।
आपण होय स्थिती । ठावो तया ॥ १००० ॥
तया अनार्ताची आर्ती । तया पूर्णाची तृप्ती ।
तया अकुळाची जाती- । गोत होय ॥ १००१ ॥
तया अचर्चाचें चिन्ह । तया अपाराचें मान ।
तया अमनस्काचें मन । बुद्धीही होय ॥ १००२ ॥
तया निराकाराचा आकारु । तया निर्व्यापाराचा व्यापारु ।
निरहंकाराचा अहंकारु । होऊनि ठाके ॥ १००३ ॥
तया अनामाचें नाम । तया अजाचें जन्म ।
आपण होय कर्म- । क्रिया तया ॥ १००४ ॥
तया निर्गुणाचे गुण । तया अचरणाचे चरण ।

तया अश्रवणाचे श्रवण । अचक्षूचे चक्षु ॥ १००५ ॥
तया भावातीताचे भाव । तया निरवयवाचे अवयव ।
किंबहुना होय सर्व । पुरुषाचें हे ॥ १००६ ॥
ऐसेनि इया प्रकृती । आपुलिया सर्व व्याप्ती ।
तया अविकारातें विकृती- । माजीं कीजे ॥ १००७ ॥
तेथ पुरुषत्व जें असे । तें ये इये प्रकृतिदशे ।
चंद्रमा अंवसे । पडिला जैसा ॥ १००८ ॥
विदळ बहु चोखा । मीनलिया वाला एका ।
कसु होय पांचका । जयापरी ॥ १००९ ॥
कां साधूतें गोंधळी । संचारोनि सुये मैळी ।
नाना सुदिनाचा आभाळीं । दुर्दिनु कीजे ॥ १०१० ॥
जेवीं पय पशूच्या पोटीं । कां वन्हि जैसा काष्ठीं ।
गुंडूनि घेतला पटीं । रत्नदीपु ॥ १०११ ॥
राजा पराधीनु जाहला । कां सिंहु रोगें रुंधला ।
तैसा पुरुष प्रकृती आला । स्वतेजा मुके ॥ १०१२ ॥
जागता नरु सहसा । निद्रा पाडूनि जैसा ।
स्वप्नींचिया सोसा । वश्यु कीजे ॥ १०१३ ॥
तैसें प्रकृति जालेपणें । पुरुषा गुण भोगणें ।
उदास अंतुरीगुणें । आतुडे जेवीं ॥ १०१४ ॥
तैसें अजा नित्या होये । आंगीं जन्ममृत्यूचे घाये ।
वाजती जैं लाहे । गुणसंगातें ॥ १०१५ ॥
परि तें ऐसें पंडुसुता । तातलें लोह पिटितां ।
जेवीं वन्हीसीचि घाता । बोलती तया ॥ १०१६ ॥
कां आंदोळलिया उदक । प्रतिभा होय अनेक ।
तें नानात्व म्हणती लोक । चंद्रीं जेवीं ॥ १०१७ ॥
दर्पणाचिया जवळिका । दुजेपण जैसें ये मुखा ।
कां कुंकुमें स्फटिका । लोहितत्व ये ॥ १०१८ ॥
तैसा गुणसंगमें । अजन्मा हा जन्मे ।
पावतु ऐसा गमे । एऱ्हवीं नाहीं ॥ १०१९ ॥
अधमोत्तमा योनी । यासि ऐसिया मानी ।
जैसा संन्यासी होय स्वप्नीं । अंत्यजादि जाती ॥ १०२० ॥
म्हणौनि केवळा पुरुषा । नाहीं होणें भोगणें देखा ।
येथ गुणसंगुचि अशेखा- । लागीं मूळ ॥ १०२१ ॥

उपद्रष्टाऽनुमन्ता च भर्ता भोक्ता महेश्वरः ।
परमात्मेति चाप्युक्तो देहेऽस्मिन् पुरुषः परः ॥ २२॥

हा प्रकृतिमाजीं उभा । परी जुई जैसा वोथंबा ।
इया प्रकृति पृथ्वी नभा । तेतुला पाडु ॥ १०२२ ॥
प्रकृतिसरितेच्या तटीं । मेरु होय हा किरीटी ।
माजीं बिंबे परी लोटीं । लोटों नेणे ॥ १०२३ ॥
प्रकृति होय जाये । हा तो असतुचि आहे ।
म्हणौनि आब्रह्माचें होये । शासन हा ॥ १०२४ ॥
प्रकृति येणें जिये । याचिया सत्ता जग विये ।
इयालागीं इये । वरयेतु हा ॥ १०२५ ॥
अनंतें काळें किरीटी । जिया मिळती इया सृष्टी ।
तिया रिगती ययाच्या पोटीं । कल्पांतसमयीं ॥ १०२६ ॥

हा महद्ब्रह्मगोसावी । ब्रह्मगोळ लाघवी ।
अपारपणें मवी । प्रपंचातें ॥ १०२७ ॥
पैं या देहामाझारीं । परमात्मा ऐसी जे परी ।
बोलिजे तें अवधारीं । ययातेंचि ॥ १०२८ ॥
अगा प्रकृतिपरौता । एकु आथी पंडुसुता ।
ऐसा प्रवादु तो तत्त्वता । पुरुषु हा पैं ॥ १०२९ ॥

य एवं वेत्ति पुरुषं प्रकृतिं च गुणैः सह ।
सर्वथा वर्तमानोऽपि न स भूयोऽभिजायते ॥ २३॥

जो निखळपणें येणें । पुरुषा यया जाणे ।
आणि गुणांचें करणें । प्रकृतीचें तें ॥ १०३० ॥
हें रूप हे छाया । पैल जळ हे माया ।
ऐसा निवाडु धनंजया । जेवीं कीजे ॥ १०३१ ॥
तेणें पाडें अर्जुना । प्रकृतिपुरुषविवंचना ।
जयाचिया मना । गोचर जाहली ॥ १०३२ ॥
तो शरीराचेनि मेळें । करूं कां कर्मे सकळें ।
परी आकाश धुई न मैळे । तैसा असे ॥ १०३३ ॥
आथिलेनि देहें । जो न घेपे देहमोहें ।
देह गेलिया नोहे । पुनरपि तो ॥ १०३४ ॥
ऐसा तया एकु । प्रकृतिपुरुषविवेकु ।
उपकारु अलौकिकु । करी पैं गा ॥ १०३५ ॥
परी हाचि अंतरीं । विवेक भानूचिया परी ।
उदैजे तें अवधारीं । उपाय बहुत ॥ १०३६ ॥

ध्यानेनात्मनि पश्यन्ति केचिदात्मानमात्मना ।
अन्ये सांख्येन योगेन कर्मयोगेन चापरे ॥ २४॥

कोणी एकु सुभटा । विचाराचा आगिटां ।
आत्मानात्मकिटा । पुटें देउनी ॥ १०३७ ॥
छत्तीसही वानी भेद । तोडोनियां निर्विवाद ।
निवडिती शुद्ध । आपणपें ॥ १०३८ ॥
तया आपणपयाच्या पोटीं । आत्मध्यानाचिया दिठी ।
देखती गा किरीटी । आपणपेंचि ॥ १०३९ ॥
आणिक पैं दैवबगें । चित्त देती सांख्ययोगें ।
एक ते अंगलगें । कर्माचेनी ॥ १०४० ॥

अन्ये त्वेवमजानन्तः श्रुत्वाऽन्येभ्य उपासते ।
तेऽपि चातितरंत्येव मृत्युं श्रुतिपरायणः ॥ २५॥

येणें येणें प्रकारें । निस्तरती साचोकारें ।
हें भवा भेउरें । आघवेंचि ॥ १०४१ ॥
परी ते करिती ऐसें । अभिमानु दवडूनि देशें ।

एकाचिया विश्वासें । टेंकती बोला ॥ १०४२ ॥
जे हिताहित देखती । हानि कणवा घेपती ।
पुसोनि शिणु हरिती । देती सुख ॥ १०४३ ॥
तयांचेनि मुखें जें निघे । तेतुलें आदरें चांगें ।
ऐकोनियां आंगें । मनें होती ॥ १०४४ ॥
तया ऐकणेयाचि नांवें । ठेविती गा आघवें ।
तया अक्षरांसीं जीवें । लोण करिती ॥ १०४५ ॥
तेही अंतीं कपिध्वजा । इया मरणार्णवसमाजा- ।
पासूनि निघती वोजा । गोमटिया ॥ १०४६ ॥
ऐसेसे हे उपाये । बहुवस एथें पाहें ।
जाणावया होये । एकी वस्तु ॥ १०४७ ॥
आतां पुरे हे बहुत । पैं सर्वार्थाचें मथित ।
सिद्धांतनवनीत । देऊं तुज ॥ १०४८ ॥
येतुलेनि पंडुसुता । अनुभव लाहाणा आयिता ।
येर तंव तुज होतां । सायास नाहीं ॥ १०४९ ॥
म्हणौनि ते बुद्धि रचूं । मतवाद हे खांचूं ।
सोलीव निर्वचूं । फलितार्थुची ॥ १०५० ॥

यावत्संजायते किंचित्सत्त्वं स्थावरजंगमम् ।
क्षेत्रक्षेत्रज्ञसंयोगात्तद्विद्धि भरतर्षभ ॥ २६॥

तरी क्षेत्रज्ञ येणें बोलें । तुज आपणपें जें दाविलें ।
आणि क्षेत्रही सांगितलें । आघवें जें ॥ १०५१ ॥
तया येरयेरांच्या मेळीं । होईजे भूतीं सकळीं ।
अनिलसंगें सलिलीं । कल्लोळ जैसे ॥ १०५२ ॥
कां तेजा आणि उखरा । भेटी जालिया वीरा ।
मृगजळाचिया पूरा । रूप होय ॥ १०५३ ॥
नाना धाराधरधारीं । झळंबलिया वसुंधरी ।
उठिजे जेवीं अंकुरीं । नानाविधीं ॥ १०५४ ॥
तैसें चराचर आघवें । जें कांहीं जीवु नावें ।
तें तों उभययोगें संभवे । ऐसें जाण ॥ १०५५ ॥
इयालागीं अर्जुना । क्षेत्रज्ञा प्रधाना- ।
पासूनि न होती भिन्ना । भूतव्यक्ती ॥ १०५६ ॥

समं सर्वेषु भूतेषु तिष्ठन्तं परमेश्वरम् ।
विनश्यत्स्वविनश्यन्तं यः पश्यति स पश्यति ॥ २७॥

पैं पटत्व तंतु नव्हे । तरी तंतूसीचि तें आहे ।
ऐसां खोलीं डोळां पाहें । ऐक्य हें गा ॥ १०५७ ॥
भूतें आघवींचि होती । एकाचीं एक आहाती ।
परी तूं प्रतीती । यांची घे पां ॥ १०५८ ॥
यांचीं नामेंही आनानें । अनारिसीं वर्तनें ।
वेषही सिनाने । आघवेयांचे ॥ १०५९ ॥
ऐसें देखोनि किरीटी । भेद सूसी हन पोटीं ।
तरी जन्माचिया कोटी । न लाहसी निघों ॥ १०६० ॥

पैं नानाप्रयोजनशीळें । दीर्घें वक्रें वर्तुळें ।
होती एकाचींच फळें । तुंबिणीयेचीं ॥ १०६१ ॥
होतु कां उजू वांकुडें । परी बोरीचे हें न मोडे ।
तैसी भूतें अवघडें । परी वस्तु उजू ॥ १०६२ ॥
अंगारकणीं बहुवसीं । उष्णता समान जैशी ।
तैसा नाना जीवराशीं । परेशु असे ॥ १०६३ ॥
गगनभरी धारा । परी पाणी एकचि वीरा ।
तैसा या भूताकारा । सर्वांगीं तो ॥ १०६४ ॥
हें भूतग्राम विषम । परी वस्तू ते एथ सम ।
घटमठीं व्योम । जिंयापरी ॥ १०६५ ॥
हा नाशतां भूताभासु । एथ आत्मा तो अविनाशु ।
जैसा केयूरादिकीं कसु । सुवर्णाचा ॥ १०६६ ॥
एवं जीवधर्महीनु । जो जीवेंसीं अभिन्नु ।
देख तो सुनयनु । ज्ञानियांमाजीं ॥ १०६७ ॥
ज्ञानाचा डोळा डोळसां- । माजीं डोळसु तो वीरेशा ।
हे स्तुति नोहे बहुवसा । भाग्याचा तो ॥ १०६८ ॥

समं पश्यन्हि सर्वत्र समवस्थितमीश्वरम् ।
न हिनस्त्यात्मनात्मानं ततो याति परां गतिम् ॥ २८॥

जे गुणेंद्रिय धोकोटी । देह धातूंची त्रिकुटी ।
पांचमेळावा वोखटी । दारुण हे ॥ १०६९ ॥
हें उघड पांचवेउली । पंचधां आगी लागली ।
जीवपंचानना सांपडली । हरिणकुटी हे ॥ १०७० ॥
ऐसा असोनि इये शरीरीं । कोण नित्यबुद्धीची सुरी ।
अनित्यभावाच्या उदरीं । दाटीचिना ॥ १०७१ ॥
परी इये देहीं असतां । जो नयेचि आपणया घाता ।
आणि शेखीं पंडुसुता । तेथेंचि मिळे ॥ १०७२ ॥
जेथ योगज्ञानाचिया प्रौढी । वोलांडूनियां जन्मकोडी ।
न निगों इया भाषा बुडी । देती योगी ॥ १०७३ ॥
जें आकाराचें पैल तीर । जें नादाची पैल मेर ।
तुर्येचें माजघर । परब्रह्म जें ॥ १०७४ ॥
मोक्षासकट गती । जेथें येती विश्रांती ।
गंगादि आपांपती । सरिता जेवीं ॥ १०७५ ॥
तें सुख येणेंचि देहें । पाय पाखाळणिया लाहे ।
जो भूतवैषम्यें नोहे । विषमबुद्धी ॥ १०७६ ॥
दीपांचिया कोडी जैसें । एकचि तेज सरिसें ।
तैसा जो असतुचि असे । सर्वत्र ईशु ॥ १०७७ ॥
ऐसेनि समत्वें पंडुसुता । जिये जो देखत साता ।
तो मरण आणि जीविता । नागवे फुडा ॥ १०७८ ॥
म्हणौनि तो दैवागळा । वानीत असों वेळोवेळां ।
जे साम्यसेजे डोळां । लागला तया ॥ १०७९ ॥

प्रकृत्यैव च कर्माणि क्रियमाणानि सर्वशः ।
यः पश्यति तथाऽऽत्मानंअकर्तारं स पश्यति ॥ २९॥

आणि मनोबुद्धिप्रमुखें । कर्मेंद्रियें अशेखें ।
करी प्रकृतीचि हें देखे । साच जो गा ॥ १०८० ॥
घरींचीं राहटती घरीं । घर कांहीं न करी ।
अभ्र धांवे अंबरीं । अंबर तें उगें ॥ १०८१ ॥
तैसी प्रकृति आत्मप्रभा । खेळे गुणीं विविधारंभा ।
येथ आत्मा तो वोथंबा । नेणे कोण ॥ १०८२ ॥
ऐसेनि येणें निवाडें । जयाच्या जीवीं उजिवडें ।
अकर्तयातें फुडें । देखिलें तेणें ॥ १०८३ ॥

यदा भूतपृथग्भावमेकस्थमनुपश्यति ।
तत एव च विस्तारं ब्रह्म संपद्यते तदा ॥ ३०॥

एऱ्हवीं तैंचि अर्जुना । होईजे ब्रह्मसंपन्ना ।
जैं या भूताकृती भिन्ना । दिसती एकी ॥ १०८४ ॥
लहरी जैसिया जळीं । परमाणुकणिका स्थळीं ।
रश्मीकरमंडळीं । सूर्याच्या जेवीं ? ॥ १०८५ ॥
नातरी देहीं अवेव । मनीं आघवेचि भाव ।
विस्फुलिंग सावेव । वन्हीं एकीं ॥ १०८६ ॥
तैसे भूताकार एकाचे । हें दिठी रिगे जैं साचें ।
तैंचि ब्रह्मसंपत्तीचें । तारूं लागे ॥ १०८७ ॥
मग जया तयाकडे । ब्रह्मेचि दिठी उघडे ।
किंबहुना जोडे । अपार सुख ॥ १०८८ ॥
येतुलेनि तुज पार्था । प्रकृतिपुरुषव्यवस्था ।
ठायें ठावो प्रतीतिपथा- । माजीं जाहली ? ॥ १०८९ ॥
अमृत जैसें ये चुळा । कां निधान देखिजे डोळां ।
तेतुला जिव्हाळा । मानावा हा ॥ १०९० ॥
जी जाहलिये प्रतीती । घर बांधणें जें चित्तीं ।
तें आतां ना सुभद्रापती । इयावरी ॥ १०९१ ॥
तरी एक दोन्ही ते बोल । बोलिजती सखोल ।
देईं मनातें वोल । मग ते घेईं ॥ १०९२ ॥
ऐसें देवें म्हणितलें । मग बोलों आदरिलें ।
तेथें अवधानाचेचि केलें । सर्वांग येरें ॥ १०९३ ॥

अनादित्वान्निर्गुणत्वात् परमात्मायमव्ययः ।
शरीरस्थोऽपि कौन्तेय न करोति न लिप्यते ॥ ३१॥

तरी परमात्मा म्हणिपे । तो ऐसा जाण स्वरूपें ।
जळीं जळें न लिंपे । सूर्यु जैसा ॥ १०९४ ॥
कां जे जळा आदीं पाठीं । तो असतुचि असे किरीटी ।
माजीं बिंबे तें दृष्टी । आणिकांचिये ॥ १०९५ ॥
तैसा आत्मा देहीं । आथि म्हणिपे हें कांहीं ।
साचें तरी नाहीं । तो जेथिंचा तेथें ॥ १०९६ ॥
आरिसां मुख जैसें । बिंबलिया नाम असे ।
देहीं वसणें तैसें । आत्मतत्त्वा ॥ १०९७ ॥

तया देहा म्हणती भेटी । हे सपायी निर्जीव गोठी ।
वारिया वाळुवे गांठी । कैंही आहे ? ॥ १०९८ ॥
आगी आणि कापुसा । दोरा सुवावा कैसा ।
केउता सांदा आकाशा । पाषाणेंसी ? ॥ १०९९ ॥
एक निघे पूर्वेकडे । एक तें पश्चिमेकडे ।
तिये भेटीचेनि पाडें । संबंधु हा ॥ ११०० ॥
उजियेडा आणि अंधारेया । जो पाडु मृता उभेयां ।
तोचि गा आत्मया । देहा जाण ॥ ११०१ ॥
रात्री आणि दिवसा । कनका आणि कापुसा ।
अपाडु कां जैसा । तैसाचि यासी ॥ ११०२ ॥
देह तंव पांचांचें जालें । हें कर्माचें गुणीं गुंथले ।
भंवतसे चाकीं सूदलें । जन्ममृत्यूच्या ॥ ११०३ ॥
हें काळानळाच्या तोंडीं । घातली लोणियाची उंडी ।
माशी पांखु पाखडी । तंव हें सरे ॥ ११०४ ॥
हें विपायें आगींत पडे । तरी भस्म होऊनि उडे ।
जाहलें श्वाना वरपडें । तरी ते विष्ठा ॥ ११०५ ॥
या चुके दोहीं काजा । तरी होय कृमींचा पुंजा ।
हा परिणामु कपिध्वजा । कश्मलु गा ॥ ११०६ ॥
या देहाची हे दशा । आणि आत्मा तो एथ ऐसा ।
पैं नित्य सिद्ध आपैसा । अनादिपणें ॥ ११०७ ॥
सकळु ना निष्कळु । अक्रियु ना क्रियाशीळु ।
कृश ना स्थुळु । निर्गुणपणें ॥ ११०८ ॥
आभासु ना निराभासु । प्रकाशु ना अप्रकाशु ।
अल्प ना बहुवसु । अरूपपणें ॥ ११०९ ॥
रिता ना भरितु । रहितु ना सहितु ।
मूर्तु ना अमूर्तु । शून्यपणें ॥ १११० ॥
आनंदु ना निरानंदु । एक ना विविधु ।
मुक्त ना बद्धु । आत्मपणें ॥ ११११ ॥
येतुला ना तेतुला । आइता ना रचिला ।
बोलता ना उगला । अलक्शपणें ॥ १११२ ॥
सृष्टीच्या होणा न रचे । सर्वसंहारें न वेंचे ।
आथी नाथी या दोहींचें । पंचत्व तो ॥ १११३ ॥
मवे ना चर्चे । वाढे ना खांचे ।
विटे ना वेंचे । अव्ययपणें ॥ १११४ ॥
एवं रूप पैं आत्मा । देहीं जें म्हणती प्रियोत्तमा ।
तें मठाकारें व्योमा । नाम जैसें ॥ १११५ ॥
तैसें तयाचिये अनुस्यूती । होती जाती देहाकृती ।
तो घे ना सांडी सुमती । जैसा तैसा ॥ १११६ ॥
अहोरात्रें जैशी । येती जाती आकाशीं ।
आत्मसत्तें तैसीं । देहें जाण ॥ १११७ ॥
म्हणौनि इयें शरीरीं । कांहीं करवीं ना करी ।
आयताही व्यापारीं । सज्ज न होय ॥ १११८ ॥
यालागीं स्वरूपें । उणा पुरा न घेपे ।
हें असो तो न लिंपे । देहीं देहा ॥ १११९ ॥

यथा सर्वगतं सौक्ष्म्यादाकाशं नोपलिप्यते ।
सर्वत्रावस्थितो देहे तथाऽऽत्मा नोपलिप्यते ॥ ३२॥

अगा आकाश कें नाहीं ? । हें न रिघेचि कवणे ठायीं ? ।
परी कायिसेनि कहीं । गादिजेना ॥ ११२० ॥
तैसा सर्वत्र सर्व देहीं । आत्मा असतुचि असे पाहीं ।
संगदोषें एकेंही । लिप्त नोहे ॥ ११२१ ॥
पुढतपुढती एथें । हेंचि लक्षण निरुतें ।
जे जाणावें क्षेत्रज्ञातें । क्षेत्रविहीना ॥ ११२२ ॥
संसर्गें चेष्टिजे लोहें । परी लोह भ्रामकु नोहे ।
क्षेत्रक्षेत्रज्ञां आहे । तेतुला पाडु ॥ ११२३ ॥
दीपकाची अर्ची । राहाटी वाहे घरींची ।
परी वेगळीक कोडीची । दीपा आणि घरा ॥ ११२४ ॥
पैं काष्ठाच्या पोटीं । वन्हि असे किरीटी ।
परी काष्ठ नोहे या दृष्टी । पाहिजे हा ॥ ११२५ ॥
अपाडु नभा आभाळा । रवि आणि मृगजळा ।
तैसाचि हाही डोळां । देखसी जरी ॥ ११२६ ॥

यथा प्रकाशयत्येकः कृत्स्नं लोकमिमं रविः ।
क्षेत्रं क्षेत्री तथा कृत्स्नं प्रकाशयति भारत ॥ ३३॥

हें आघवेंचि असो एकु । गगनौनि जैसा अर्कु ।
प्रगटवी लोकु । नांवें नांवें ॥ ११२७ ॥
एथ क्षेत्रज्ञु तो ऐसा । प्रकाशकु क्षेत्राभासा ।
यावरुतें हें न पुसा । शंका नेघा ॥ ११२८ ॥

क्षेत्रक्षेत्रज्ञयोरेवमन्तरं ज्ञानचक्षुषा ।
भूतप्रकृतिमोक्षं च विदुर्यान्ति ते परम् ॥ ३४॥
ॐ तत्सदिति श्रीमद्भगवद्गीतासूपनिषत्सु ब्रह्मविद्यायां योगशास्त्रे
श्रीकृष्णार्जुनसंवादे क्षेत्रक्षेत्रज्ञयोगोनाम त्रयोदशोऽध्यायः ॥ १३ ॥

शब्दतत्त्वसारज्ञा । पैं देखणें तेचि प्रज्ञा ।
जे क्षेत्रा क्षेत्रज्ञा । अपाडु देखे ॥ ११२९ ॥
इया दोहींचें अंतर । देखावया चतुर ।
ज्ञानियांचे द्वार । आराधिती ॥ ११३० ॥
याचिलागीं सुमती । जोडिती शांतिसंपत्ती ।
शास्त्रांचीं दुभतीं । पोसिती घरीं ॥ ११३१ ॥
योगाचिया आकाशा । वळघिजे येवढाचि धिंवसा ।
याचियाचि आशा । पुरुषासि गा ॥ ११३२ ॥
शरीरादि समस्त । मानिताति तृणवत ।
जीवें संतांचे होत । वाहणधरु ॥ ११३३ ॥
ऐसैसियापरी । ज्ञानाचिया भरोवरी ।
करूनियां अंतरीं । निरुतें होती ॥ ११३४ ॥
मग क्षेत्रक्षेत्रज्ञांचें । जें अंतर देखती साचें ।
ज्ञानें उन्मेख तयांचें । वोवाळूं आम्ही ॥ ११३५ ॥
आणि महाभूतादिकीं । प्रभेदलीं अनेकीं ।
पसरलीसे लटिकी । प्रकृति जे हे ॥ ११३६ ॥

जे शुकनळिकान्यायें । न लगती लागली आहे ।
हें जैसें तैसें होये । ठाउवें जयां ॥ ११३७ ॥
जैसी माळा ते माळा । ऐसीचि देखिजे डोळां ।
सर्पबुद्धि टवाळा । उखी हौनी ॥ ११३८ ॥
कां शुक्ति ते शुक्ती । हे साच होय प्रतीती ।
रुपेयाची भ्रांती । जाऊनियां ॥ ११३९ ॥
तैसी वेगळी वेगळेपणें । प्रकृति जे अंतःकरणें ।
देखती ते मी म्हणें । ब्रह्म होती ॥ ११४० ॥
जें आकाशाहूनि वाड । जें अव्यक्ताची पैल कड ।
जें भेटलिया अपाडा पाड । पडों नेदी ॥ ११४१ ॥
आकारु जेथ सरे । जीवत्व जेथ विरे ।
द्वैत जेथ नुरे । अद्वय जें ॥ ११४२ ॥
तें परम तत्त्व पार्था । होती ते सर्वथा ।
जे आत्मानात्मव्यवस्था- । राजहंसु ॥ ११४३ ॥
ऐसा हा जी आघवा । श्रीकृष्णें तया पांडवा ।
उगाणा दिधला जीवा । जीवाचिया ॥ ११४४ ॥
येर कलशींचें येरीं । रिचविजे जयापरी ।
आपणपें तया श्रीहरी । दिधलें तैसें ॥ ११४५ ॥
आणि कोणा देता कोण । तो नर तैसा नारायण ।
वरी अर्जुनातें श्रीकृष्ण । हा मी म्हणे ॥ ११४६ ॥
परी असो तें नाथिलें । न पुसतां कां मी बोलें ।
किंबहुना दिधलें । सर्वस्व देवें ॥ ११४७ ॥
कीं तो पार्थु जी मनीं । अझुनी तृप्ती न मनी ।
अधिकाधिक उतान्ही । वाढवीतु असे ॥ ११४८ ॥
स्नेहाचिया भरोवरी । आंबुथिला दीपु घे थोरी ।
चाड अर्जुना अंतरीं । परिसतां तैसी ॥ ११४९ ॥
तेथ सुगरिणी आणि उदारे । रसज्ञ आणि जेवणारे ।
मिळती मग अवतरे । हातु जैसा ॥ ११५० ॥
तैसें जी होतसे देवा । तया अवधानाचिया लवलवा ।
पाहतां व्याख्यान चढलें थांवा । चौगुणें वरी ॥ ११५१ ॥
सुवायें मेघु सांवरे । जैसा चंद्रें सिंधु भरे ।
तैसा मातुला रसु आदरें । श्रोतयांचेनि ॥ ११५२ ॥
आतां आनंदमय आघवें । विश्व कीजेल देवें ।
तें रायें परिसावें । संजयो म्हणे ॥ ११५३ ॥
एवं जे महाभारतीं । श्रीव्यासें आप्रांतमती ।
भीष्मपर्वसंगतीं । म्हणितली कथा ॥ ११५४ ॥
तो कृष्णार्जुनसंवादु । नागरीं बोलीं विशदु ।
सांगोनि दाऊं प्रबंधु । वोवियेचा ॥ ११५५ ॥
नुसधीचि शांतिकथा । आणिजेल कीर वाक्पथा ।
जे शृंगाराच्या माथां । पाय ठेवी ॥ ११५६ ॥
दाऊं वेल्हाळे देशी नवी । जे साहित्यातें वोजावी ।
अमृतातें चुकी ठेवी । गोडिसेंपणें ॥ ११५७ ॥
बोल वोल्हावतेनि गुणें । चंद्रासि घे उमाणे ।
रसरंगीं भुलवणें । नादु लोपी ॥ ११५८ ॥
खेचरांचियाही मना । आणीन सात्त्विकाचा पान्हा ।
श्रवणासवें सुमना । समाधि जोडे ॥ ११५९ ॥
तैसा वाग्विलास विस्तारू । गीतार्थेंसी विश्व भरूं ।
आनंदाचें आवारूं । मांडूं जगा ॥ ११६० ॥
फिटो विवेकाची वाणी । हो कानामनाची जिणी ।

देखो आवडे तो खाणी । ब्रह्मविद्येची ॥ ११६१ ॥
दिसो परतत्त्व डोळां । पाहो सुखाचा सोहळा ।
रिघो महाबोध सुकाळा- । माजीं विश्व ॥ ११६२ ॥
हें निफजेल आतां आघवें । ऐसें बोलिजेल बरवें ।
जें अधिष्ठिला असें परमदेवें । श्रीनिवृत्तीं मी ॥ ११६३ ॥
म्हणौनि अक्षरीं सुभेदीं । उपमा श्लोक कोंदाकोंदी ।
झाडा देईन प्रतिपदीं । ग्रंथार्थासी ॥ ११६४ ॥
हा ठावोवरी मातें । पुरतया सारस्वतें ।
केलें असे श्रीमंतें । श्रीगुरुरायें ॥ ११६५ ॥
तेणें जी कृपासावायें । मी बोलें तेतुलें सामाये ।
आणि तुमचिये सभे लाहें । गीता म्हणों ॥ ११६६ ॥
वरी तुम्हा संतांचे पाये । आजि मी लाधलों आहें ।
म्हणौनि जी नोहे । अटकु काहीं ॥ ११६७ ॥
प्रभु काश्मिरीं मुकें । नुपजे हें काय कौतुकें ।
नाहीं उणीं सामुद्रिकें । लक्ष्मीयेसी ॥ ११६८ ॥
तैसी तुम्हां संतांपासीं । अज्ञानाची गोठी कायसी ।
यालागीं नवरसीं । वरुषेन मी ॥ ११६९ ॥
किंबहुना आतां देवा । अवसरु मज देयावा ।
ज्ञानदेव म्हणे बरवा । सांगेन ग्रंथु ॥ ११७० ॥
इति श्रीज्ञानदेवविरचितायां भावार्थदीपिकायां त्रयोदशोऽध्यायः ॥

॥ ॐ श्री परमात्मने नमः ॥

॥ अथ श्रीमद्भगवद्गीता ॥

। अथ चतुर्दशोऽध्यायः - अध्याय चौदावा । ।

। गुणत्रयविभागयोगः ।

जय जय आचार्या । समस्तसुरवर्या ।
प्रज्ञाप्रभातसूर्या । सुखोदया ॥ १ ॥
जय जय सर्व विसांवया । सोहंभावसुहावया ।
नाना लोक हेलावया । समुद्रा तूं ॥ २ ॥
आइकें गा आर्तबंधू । निरंतरकारुण्यसिंधू ।
विशदविद्यावधू- । वल्लभा जी ॥ ३ ॥
तू जयांप्रति लपसी । तया विश्व हें दाविसी ।
प्रकट तैं करिसी । आघवेंचि तूं ॥ ४ ॥
कीं पुढिलाची दृष्टि चोरिजे । हा दृष्टिबंधु निफजे ।
परी नवल लाघव तुझें । जें आपणपें चोरें ॥ ५ ॥
जी तूंचि तू सर्वां यया । मा कोणा बोधु कोणा माया ।
ऐसिया आपेंआप लाघविया । नमो तुज ॥ ६ ॥
जाणों जगीं आप वोलें । तें तुझिया बोला सुरस जालें ।
तुझेनि क्षमत्व आलें । पृथ्वियेसी ॥ ७ ॥
रविचंद्रादि शुक्ती । उदो करिती त्रिजगतीं ।
तें तुझिया दीप्ती । तेज तेजां ॥ ८ ॥
चळवळिजे अनिळें । तें दैविकेनि जी निजबळें ।
नभ तुजमाजीं खेळे । लपीथपी ॥ ९ ॥
किंबहुना माया असोस । ज्ञान जी तुझेनि डोळस ।
असो वानणें सायास । श्रुतीसि हे ॥ १० ॥
वेद वानूनि तंवचि चांग । जंव न दिसे तुझें आंग ।
मग आम्हां तया मूग । एके पांती ॥ ११ ॥
जी एकार्णवाचे ठाईं । पाहतां थेंबाचा पाडु नाहीं ।
मा महानदी काई । जाणिजती ॥ १२ ॥
कां उअदयलिया भास्वतु । चंद्र जैसा खद्योतु ।
आम्हां श्रुति तुज आंतु । तो पाडु असे ॥ १३ ॥
आणि दुजया थांवो मोडे । जेथ परेशीं वैखरी बुडे ।
तो तूं मा कोणें तोंडें । वानावासी ॥ १४ ॥
यालागीं आतां । स्तुति सांडूनि निवांता ।
चरणीं ठेविजे माथा । हेंचि भलें ॥ १५ ॥
तरी तू जैसा आहासि तैसिया । नमो जी श्रीगुरुराया ।
मज ग्रंथोद्यमु फळावया । वेव्हारा होईं ॥ १६ ॥
आतां कृपाभांडवल सोडीं । भरीं मति माझी पोतडी ।
करीं ज्ञानपद्य जोडी । थोरा मातें ॥ १७ ॥
मग मी संसरेन तेणें । करीन संतांसी कर्णभूषणें ।
लेववीन सुलक्षणें । विवेकाचीं ॥ १८ ॥
जी गीतार्थनिधान । काढू माझें मन ।
सुयीं स्नेहांजन । आपलें तूं ॥ १९ ॥
हे वाक्सृष्टि एके वेळे । देखतु माझे बुद्धीचे डोळे ।
तैसा उदैजो जो निर्मळें । कारुण्यबिंबें ॥ २० ॥

माझी प्रज्ञावेली वेल्हाळ । काव्यें होय सफळ ।
तो वसंतु होय स्नेहाळ- । शिरोमणी ॥ २१ ॥
प्रमेय महापूरें । हे मतिगंगा ये थोरें ।
तैसा वरिष उदारें । दिठीवेनी ॥ २२ ॥
अगा विश्वैकधामा । तुझा प्रसाद चंद्रमा ।
करूं मज पूर्णिमा । स्फूर्तीची जी ॥ २३ ॥
जी अवलोकिलिया मातें । उन्मेषसागरीं भरितें ।
वोसंडेल स्फूर्तीतें । रसवृत्तीचें ॥ २४ ॥
तंव संतोषोनि श्रीगुरुराजें । म्हणितलें विनतिव्याजें ।
मांडिलें देखोनि दुजें । स्तवनमिषें ॥ २५ ॥
हें असो आतां वांजटा । तो ज्ञानार्थ करूनि गोमटा ।
ग्रंथु दावीं उत्कंठा । भंगो नेदीं ॥ २६ ॥
हो कां जी स्वामी । हेंचि पाहत होतों मी ।
जे श्रीमुखें म्हणा तुम्ही । ग्रंथु सांग ॥ २७ ॥
सहजें दुर्वेचा डिरु । आंगेंचि तंव अमरु ।
वरी आला पूरु । पीयूषाचा ॥ २८ ॥
तरी आतां येणें प्रसादें । विन्यासें विदग्धें ।
मूळशास्त्रपदें । वाखाणीन ॥ २९ ॥
परी जीवा आंतुलीकडे । जैसी संदेहाची डोणी बुडे ।
ना श्रवणीं तरी चाडे । वाढी दिसे ॥ ३० ॥
तैसी बोली साचारी । अवतरो माझी माधुरी ।
माले मागूनि घरीं । गुरुकृपेच्या ॥ ३१ ॥
तरी मागां त्रयोदशीं । अध्यायीं गोठी ऐसी ।
श्रीकृष्ण अर्जुनेंसी । चावळले ॥ ३२ ॥
जे क्षेत्रक्षेत्रज्ञयोगें । होईजे येणें जगें ।
आत्मा गुणसंगें । संसारिया ॥ ३३ ॥
आणि हाचि प्रकृतिगतु । सुखदुःख भोगीं हेतु ।
अथवा गुणातीतु । केवळु हा ॥ ३४ ॥
तरी कैसा पां असंगा संगु । कोण तो क्षेत्रक्षेत्रज्ञायोगु ।
सुखदुःखादि भोगु । केवीं तया ? ॥ ३५ ॥
गुण ते कैसे किती । बांधती कवणे रीती ।
नातरी गुणातीतीं । चिन्हें काई ? ॥ ३६ ॥
एवं इया आघवेया । अर्था रूप करावया ।
विषो एथ चौदाविया । अध्यायासी ॥ ३७ ॥
तरी तो आतां ऐसा । प्रस्तुत परियेसा ।
अभिप्रायो विश्वेशा । वैकुंठाचा ॥ ३८ ॥
तो म्हणे गा अर्जुना । अवधानाची सर्व सेना ।
मेळऊनि इया ज्ञाना । झोंबावें हो \! ॥ ३९ ॥
आम्हीं मागां तुज बहुतीं । दाविलें हें उपपत्ती ।
तरी आझुनी प्रतीती- । कुशीं न निघे ॥ ४० ॥

श्रीभगवानुवाच ।
परं भूयः प्रवक्ष्यामि ज्ञानानां ज्ञानमुत्तमम् ।
यद्ज्ञात्वा मुनयः सर्वे परां सिद्धिमितो गताः ॥ १॥

म्हणौनि गा पुढती । सांगिजैल तुजप्रती ।
पर म्हण म्हणौनि श्रुतीं । डाहारिलें जें ॥ ४१ ॥
एऱ्हवीं ज्ञान हें आपुलें । परी पर ऐसेनि जालें ।
जे आवडोनि घेतलें । भवस्वर्गादिक ॥ ४२ ॥
अगा याचि कारणें । हें उत्तम सर्वांपरी मी म्हणें ।
जे वन्हि हें तृणें । येरें ज्ञानें ॥ ४३ ॥
जियें भवस्वर्गातें जाणती । यागचि चांग म्हणती ।
पारखी फुडी आथी । भेदीं जया ॥ ४४ ॥
तियें आघवींचि ज्ञानें । केलीं येणें स्वप्नें ।
जैशा वातोर्मी गगनें । गिळिजती अंतीं ॥ ४५ ॥
कां उदितें रश्मिराजें । लोपिलीं चंद्रादि तेजें ।
नाना प्रळयांबुमाजें । नदी नद ॥ ४६ ॥
तैसें येणें पाहलेया । ज्ञानजात जाय लया ।
म्हणौनियां धनंजया । उत्तम हें ॥ ४७ ॥
अनादि जे मुक्तता । आपुली असे पंडुसुता ।
तो मोक्षु हातां येता । होय जेणें ॥ ४८ ॥
जयाचिया प्रतीती । विचारवीरीं समस्तीं ।
नेदिजेचि संसृती । माथां उधऊं ॥ ४९ ॥
मनें मन घालूनि मागें । विश्रांति जालिया आंगें ।
ते देहीं देहाजोगे । होतीचि ना ॥ ५० ॥
मग तें देहाचें बेळें । वोलांडूनि एकेचि वेळे ।
संवतुकी कांटाळें । माझें जालें ॥ ५१ ॥

इदं ज्ञानमुपाश्रित्य मम साधर्म्यमागताः ।
सर्गेऽपि नोपजायन्ते प्रलये न व्यथन्ति च ॥ २॥

जे माझिया नित्यता । तेणें नित्य ते पंडुसुता ।
परिपूर्ण पूर्णता । माझियाची ॥ ५२ ॥
मी जैसा अनंतानंदु । जैसाचि सत्यसिंधु ।
तैसेचि ते भेदु । उरेचि ना ॥ ५३ ॥
जें मी जेवढें जैसें । तेंचि ते जाले तैसें ।
घटभंगीं घटाकाशें । आकाश जेवीं ॥ ५४ ॥
नातरीं दीपमूळकीं । दीपशिखा अनेकीं ।
मीनलिया अवलोकीं । होय जैसें ॥ ५५ ॥
अर्जुना तयापरी । सरली द्वैताची वारी ।
नांदे नामार्थ एकाहारीं । मीतूंविण ॥ ५६ ॥
येणेंचि पैं कारणें । जैं पहिलें सृष्टीचें जुंपणें ।
तेंही तया होणें । पडेचिना ॥ ५७ ॥
सृष्टीचिये सर्वादी । जयां देहाची नाहीं बांधी ।
ते कैचें प्रळयावधी । निमतील पां ? ॥ ५८ ॥
म्हणौनि जन्मक्षयां- । अतीत ते धनंजया ।
मी जालें ज्ञाना इया । अनुसरोनी ॥ ५९ ॥
ऐसी ज्ञानाची वाढी । वानिली देवें आवडी ।

तेवींचि पार्थाही गोडी । लावावया ॥ ६० ॥
तंव तया जालें आन । सर्वांगीं निघाले कान ।
सणई अवधान । आतला पां ॥ ६१ ॥
आतां देवाचिया ऐसें । जाकळीजत असे वोरसें ।
जें निरूपण आकाशें । वेंटाळेना ॥ ६२ ॥
मग म्हणे गा प्रज्ञाकांता । उजवली आजि वक्तृत्वता ।
जे बोलायेवढा श्रोता । जोडलासी ॥ ६३ ॥
तरि एकु मी अनेकीं । गोंविजे देहपाशकीं ।
त्रिगुणीं लुब्धकीं । कवणेपरी ॥ ६४ ॥
कैसा क्षेत्रयोगें । वियें इयें जगें ।
तें परिस सांगें । कवणेपरी ॥ ६५ ॥
पैं क्षेत्र येणें व्याजें । यालागीं हें बोलिजे ।
जे मत्संगबीजें । भूतीं पिके ॥ ६६ ॥

मम योनिर्महद्ब्रह्म तस्मिन्गर्भं दधामहम्यम् ।
संभवः सर्वभूतानां ततो भवति भारत ॥ ३॥

एऱ्हवीं तरी महद्ब्रह्म । यालागीं हें ऐसें नाम ।
जे महदादिविश्राम । शालिका हें ॥ ६७ ॥
विकारां बहुवस थोरी । अर्जुना हेंचि करी ।
म्हणौनि अवधारीं । महद्ब्रह्म ॥ ६८ ॥
अव्यक्तवादमतीं । अव्यक्त ऐसी वदंती ।
सांख्याचिया प्रतीती । प्रकृति हेचि ॥ ६९ ॥
वेदांतीं इयेतें माया । ऐसें म्हणिजे प्राज्ञराया ।
असो किती बोलों वायां । अज्ञान हें ॥७० ॥
आपला आपणपेयां । विसरु जो धनंजया ।
तेंचि रूप यया । अज्ञानासी ॥ ७१ ॥
आणिकही एक असे । जें विचारावेळे न दिसे ।
वातीं पाहतां जैसें । अंधारें कां ॥ ७२ ॥
हालविलिया जाय । निश्चळीं तरी होय ।
दुधीं जैसी साय । दुधाची ते ॥ ७३ ॥
पैं जागरु ना स्वप्न । ना स्वरूप अवस्थान ।
ते सुषुप्ति कां घन । जैसी होय ॥ ७४ ॥
कां न वियतां वायूतें । वांझें आकाश रितें ।
तया ऐसें निरुतें । अज्ञान गा ॥ ७५ ॥
पैल खांबु कां पुरुखु । ऐसा निश्चयो नाहीं एकु ।
परी काय नेणों आलोकु । दिसत असे ॥ ७६ ॥
तेवीं वस्तु जैसी असे । तैसी कीर न दिसे ।
परी कांहीं अनारिसें । देखिजेना ॥ ७७ ॥
ना राती ना तेज । ते संधि जेवीं सांज ।
तेवीं विरुद्ध ना निज । ज्ञान आथी ॥ ७८ ॥
ऐसी कोण्ही एकी दिशा । तिये वादु अज्ञान ऐसा ।
तया गुंडलिया प्रकाशा । क्षेत्रज्ञु नाम ॥ ७९ ॥
अज्ञान थोरिये आणिजे । आपणपें तरी नेणिजे ।

तें रूप जाणिजे । क्षेत्रज्ञाचें ॥ ८० ॥
हाचि उभय योगु । बुझें बापा चांगु ।
सत्तेचा नैसर्गु । स्वभावो हा ॥ ८१ ॥
.आतां अज्ञानासारिखें । वस्तु आपणपांचि देखे ।
परी रूपें अनेकें । नेणों कोणें ॥ ८२ ॥
जैसा रंकु भ्रमला । म्हणे जा रे मी रावो आला ।
कां मूर्च्छितु गेला । स्वर्गलोकां ॥ ८३ ॥
तेवीं लचकलिया दिठी । मग देखणें जें जें उठी ।
तया नाम सृष्टी । मीचि वियें पैं गा ॥ ८४ ॥
जैसें कां स्वप्नमोहा । तो एकाकी देखे बहुवा ।
तोचि पाडु आत्मया । स्मरणेंवीण असे ॥ ८५ ॥
हेंचि आनीभ्रांती । प्रमेय उपलवूं पुढती ।
परी तूं प्रतीती । याचि घे पां ॥ ८६ ॥
तरी माझी हे गृहिणी । अनादि तरुणी ।
अनिर्वाच्यगुणी । अविद्या हे ॥ ८७ ॥
इये नाहीं हेंचि रूप । ठाणें हें अति उमप ।
हें निद्रितां समीप । चेतां दुरी ॥ ८८ ॥
पैं माझेनिचि आंगें । पहुढल्या हे जागे ।
आणि सत्तासंभोगें । गुर्विणी होय ॥ ८९ ॥
महद्ब्रह्मौदरीं । प्रकृतीं आठै विकारीं ।
गर्भाची करी । पेलोवेली ॥ ९० ॥
उभयसंगु पहिलें । बुद्धितत्त्वें प्रसवलें ।
बुद्धितत्त्व भारैलें । होय मन ॥ ९१ ॥
तरुणी ममता मनाची । ते अहंकार तत्त्व रची ।
तेणें महाभूतांची । अभिव्यक्ति होय ॥ ९२ ॥
आणि विषयेंद्रियां गौसी । स्वभावें तंव भूतांसी ।
म्हणौनि येती सरिसीं । तियेंही रूपा ॥ ९३ ॥
जालेनि विकारक्षोभें । पाठीं त्रिगुणाचें उभें ।
तेव्हां ये वासनागर्भें । ठायेंठावों ॥ ९४ ॥
रुखाचा आवांका । जैसी बीजकणिका ।
जीवीं बांधें उदका । भेटतखेंवो ॥ ९५ ॥
तैसी माझेनि संगें । अविद्या नाना जगें ।
आर घेवों लागे । आणियाची ॥ ९६ ॥
मग गर्भगोळा तया । कैसें रूप तैं ये आया ।
तें परियेसें राया । सुजनांचिया ॥ ९७ ॥
पैं मणिज स्वेदज । उद्भिज जारज ।
उमटती सहज । अवयव हें ॥ ९८ ॥
व्योमवायुवशें । वाढलेनि गर्भरसें ।
मणिजु उससे । अवयव तो ॥ ९९ ॥
पोटीं सूनि तमरजें । आगळिकां तोय तेजें ।
उठितां निफजे । स्वेदजु गा ॥ १०० ॥
आपपृथ्वी उत्कटें । आणि तमोमात्रें निकृष्टें ।
स्थावरु उमटे । उद्भिजु हा ॥ १०१ ॥
पांचां पांचही विरजीं । होती मनबुद्ध्यादि साजीं ।
हीं हेतु जारजीं । ऐसें जाण ॥ १०२ ॥

ऐसे चारी हे सरळ । करचरणतळ ।
महाप्रकृति स्थूळ । तेंचि शिर ॥ १०३ ॥
प्रवृत्ति पेललें पोट । निवृत्ति ते पाठी नीट ।
सुर योनी आंगें आठ । ऊर्ध्वाचीं ॥ १०४ ॥
कंठु उल्हासता स्वर्गु । मृत्युलोकु मध्यभागु ।
अधोदेशु चांगु । नितंबु तो ॥ १०५ ॥
ऐसें लेकरूं एक । प्रसवली हें देख ।
जयाचें तिन्ही लोक । बाळसें गा ॥ १०६ ॥
चौर्यांयशीं लक्ष योनी । तियें कांडां पेरां सांदणी ।
वाढे प्रतिदिनीं । बाळक हें ॥ १०७ ॥
नाना देह अवयवीं । नामाचीं लेणीं लेववी ।
मोहस्तन्यें वाढवी । नित्य नवें ॥ १०८ ॥
सृष्टी वेगवेगळीया । तिया करांघ्रीं आंगोळियां ।
भिन्नाभिमान सूदलिया । मुदिया तेथें ॥ १०९ ॥
हें एकलौतें चराचर । अविचारित सुंदर ।
प्रसवोनि थोर । थोरावली ॥ ११० ॥
पै ब्रह्मा प्रातःकाळु । विष्णु तो माध्यान्ह वेळु ।
सदाशिव सायंकाळु । बाळा यया ॥ १११ ॥
महाप्रळयसेजे । खिळोनि निवांत निजे ।
विषमज्ञानें उमजें । कल्पोदयीं ॥ ११२ ॥
अर्जुना इयापरी । मिथ्यादृष्टीच्या घरीं ।
युगानुवृत्तीचीं करी । चोज पाउलें ॥ ११३ ॥
संकल्पु जयाचा इष्टु । अहंकारु तो विनटु ।
ऐसिया होय शेवटु । ज्ञानें यया ॥ ११४ ॥
आतां असो हे बहु बोली । ऐसें विश्व माया व्याली ।
तेथ साह्य जाली । माझी सत्ता ॥ ११५ ॥

सर्वयोनिषु कौन्तेय मूर्तयः संभवन्ति याः ।
तासां ब्रह्म महद्योनिरहं बीजप्रदः पिता ॥ ४॥

याकारणें मी पिता । महद्ब्रह्म हे माता ।
अपत्य पंडुसुता । जगडंबरु ॥ ११६ ॥
आतां शरीरें बहुतें । देखोनि न भेदें हो चित्तें ।
जे मनबुद्ध्यादि भूतें । एकेंचि येथें ॥ ११७ ॥
हां गा एकाचि देहीं । काय अनारिसें अवयव नाहीं ? ।
तेवीं विचित्र विश्व पाहीं । एकचि हें ॥ ११८ ॥
पैं उंचा नीचा डाहाळिया । विषमा वेगळालिया ।
येकाचि जेवीं जालिया । बीजाचिया ॥ ११९ ॥
आणि संबंधु तोही ऐसा । मृत्तिके घटु लेंकु जैसा ।
कां पटत्व कापुसा । नातू होय ॥ १२० ॥
नाना कल्लोळपरंपरा । संतती जैसी सागरा ।
आम्हां आणि चराचरा । संबंधु तैसा ॥ १२१ ॥
म्हणौनि वन्हि आणि ज्वाळ । दोन्ही वन्हीचि केवळ ।
तेवीं मी गा सकळ । संबंधु वावो ॥ १२२ ॥

जालेनि जगें मी झांकें । तरी जगत्वें कोण फांके ? ।
किळेवरी माणिकें । लोपिजे काई ? ॥ १२३ ॥
अळंकारातें आलें । तरी सोनेपण काइ गेलें ? ।
कीं कमळ फांकलें । कमळत्वा मुके ? ॥ १२४ ॥
सांग पां धनंजया । अवयवीं अवयविया ।
आच्छादिजे कीं तया । तेंचि रूप ? ॥ १२५ ॥
कीं विरूढलिया जोंधळा । कणिसाचा निर्वाळा ।
वेंचला कीं आगळा । दिसतसे ॥ १२६ ॥
म्हणौनि जग परौतें । सारूनि पाहिजे मातें ।
तैसा नोव्हें उखितें । आघवें मीचि ॥ १२७ ॥
हा तूं साचोकारा । निश्चयाचा खरा ।
गांठीं बांध वीरा । जीवाचिये ॥ १२८ ॥
आतां मियां मज दाविला । शरीरीं वेगळाला ।
गुणीं मीचि बांधला । ऐसा आवडें ॥ १२९ ॥
जैसें स्वप्नीं आपण । उठूनियां आत्ममरण ।
भोगिजे गा जाण । कपिध्वजा ॥ १३० ॥
कां कवळातें डोळे । प्रकाशूनि पिवळें ।
देखती तेंही कळे । तयांसीचि ॥ १३१ ॥
नाना सूर्यप्रकाशें । प्रकटी तैं अभ्र भासे ।
तो लोपला हेंही दिसे । सूर्येंचि कीं ॥ १३२ ॥
पैं आपणपेनि जालिया । छाया गा आपुलिया ।
बिहोनि बिहालिया । आन आहे ? ॥ १३३ ॥
तैसीं इयें नाना देहें । दाऊनि मी नाना होयें ।
तेथ ऐसा जो बंधु आहे । तेंही देखें ॥ १३४ ॥
बंधु कां न बंधिजे । हें जाणणें मज माझें ।
नेणणेनि उपजे । आपलेनि ॥ १३५ ॥
तरी कोणें गुणें कैसा । मजचि मी बंधु ऐसा ।
आवडे तें परियेसा । अर्जुनदेवा ॥ १३६ ॥
गुण ते किती किंधर्म । कायिययां रूपनाम ।
कें जालें हें वर्म । अवधारीं पां ॥ १३७ ॥

सत्त्वं रजस्तम इति गुणाः प्रकृतिसंभवाः ।
निबध्नन्ति महाबाहो देहे देहिनमव्ययम् ॥ ५॥

तरी सत्त्वरजतम । तिघांसि हें नाम ।
आणि प्रकृति जन्म- । भूमिका ययां ॥ १३८ ॥
येथ सत्त्व तें उत्तम । रज तें मध्यम ।
तिहींमाजीं तम । सावियाधारें ॥ १३९ ॥
हें एकेचि वृत्तीच्या ठायीं । त्रिगुणत्व आवडे पाहीं ।
वयसात्रय देहीं । येकीं जेवीं ॥ १४० ॥
कां मीनलेनि कीडें । जंव जंव तूक वाढे ।
तंव तंव सोनें हीन पडे । पांचिका कसीं ॥ १४१ ॥
पैं सावधपण जैसें । वाहविलें आळसें ।
सुषुप्ति बैसे । घणावोनि ॥ १४२ ॥

तैसी अज्ञानांगीकारें । निगाली वृत्ति विखुरे ।

ते सत्त्वरजद्वारें । तमही होय ॥ १४३ ॥
अर्जुना गा जाण । ययां नाम गुण ।
आतां दाखऊं खूण । बांधिती ते ॥ १४४ ॥
तरी क्षेत्रज्ञदशे । आत्मा मोटका पैसे ।
हें देह मी ऐसें । मुहूर्त करी ॥ १४५ ॥
आजन्ममरणांतीं । देहधर्मीं समस्तीं ।
ममत्वाची सूती । घे ना जंव ॥ १४६ ॥
जैसी मीनाच्या तोंडीं । पडेना जंव उंडी ।
तंव गळ आसुडी । जळपारधी ॥ १४७ ॥

तत्र सत्त्वं निर्मलत्वात् प्रकाशकमनामयम् ।
सुखसंगेन बध्नाति ज्ञानसंगेन चानघ ॥ ६॥

तेवीं सत्त्वें लुब्धकें । सुखज्ञानाचीं पाशकें ।
वोढिजती मग खुडके । मृगु जैसा ॥ १४८ ॥
मग ज्ञानें चडफडी । जाणिवेचे खुरखोडी ।
स्वयं सुख हें धाडी । हातींचें गा ॥ १४९ ॥
तेव्हां विद्यामानें तोखे । लाभमात्रें हरिखे ।
मी संतुष्ट हेंही देखे । श्लाघों लागे ॥ १५० ॥
म्हणे भाग्य ना माझें ? । आजि सुखियें नाहीं दुजें ।
विकाराष्टकें फुंजे । सात्त्विकाचेनि ॥ १५१ ॥
आणि येणेंही न सरे । लांकण लागे दुसरें ।
जें विद्वत्तेचें भरे । भूत आंगीं ॥ १५२ ॥
आपणचि ज्ञानस्वरूप आहे । तें गेलें हें दुःख न वाहे ।
कीं विषयज्ञानें होये । गगनायेवढा ॥ १५३ ॥
रावो जैसा स्वप्नीं । रंकपणें रिघे धानीं ।
तो दों दाणां मानी । इंद्रु ना मी ॥ १५४ ॥
तैसें गा देहातीता । जालेया देहवंता ।
हों लागे पंडुसुता । बाह्यज्ञानें ॥ १५५ ॥
प्रवृत्तिशास्त्र बुझे । यज्ञविद्या उमजे ।
किंबहुना सुझे । स्वर्गवरी ॥ १५६ ॥
आणि म्हणे आजि आन । मीवांचूनि नाहीं सज्ञान ।
चातुर्यचंद्रा गगन । चित्त माझें ॥ १५७ ॥
ऐसें सत्त्व सुखज्ञानीं । जीवासि लावूनि कानी ।
बैलाची करी वानी । पांगुळाचिया ॥ १५८ ॥
आतां हाचि शरीरीं । रजें जियापरी ।
बांधिजे तें अवधारीं । सांगिजैल ॥ १५९ ॥

रजो रागात्मकं विद्धि तृष्णासंगसमुद्भवम् ।
तन्निबध्नाति कौन्तेय कर्मसंगेन देहिनम् ॥ ७॥

हें रज याचि कारणें । जीवातें रंजऊं जाणे ।
हें अभिलाखाचें तरुणें । सदाचि गा ॥ १६० ॥
हें जीवीं मोटकें रिगे । आणि कामाच्या मदीं लागे ।
मग वारया वळघे । तृष्णेचिया ॥ १६१ ॥
घृतें आंबुखूनि आगियाळें । वज्राग्नीचें सादुकलें ।
आतां बहु थेंकुलें । आहे तेथ ? ॥ १६२ ॥
तैसी खवळें चाड । होय दुःखासकट गोड ।
इंद्रश्रीहि सांकड । गमों लागे ॥ १६३ ॥
तैसी तृष्णा वाढिनलिया । मेरुही हाता आलिया ।
तऱ्ही म्हणे एखादिया । दारुणा वळघो ॥ १६४ ॥
जीविताचि कुरोंडी । वोवाळूं लागे कवडी ।
मानी तृणाचिये जोडी । कृतकृत्यता ॥ १६५ ॥
आजि असतें वेंचिजेल । परी पाहे काय कीजेल ।
ऐसा पांगीं वडील । व्यवसाय मांडी ॥ १६६ ॥
म्हणे स्वर्गा हन जावें । तरी काय तेथें खावें ।
इयालागीं धांवें । याग करूं ॥ १६७ ॥
व्रतापाठीं व्रतें । आचरें इष्टापूर्तें ।
काम्यावांचूनि हातें । शिवणें नाहीं ॥ १६८ ॥
पैं ग्रीष्मांतींचा वारा । विसांवो नेणें वीरा ।
तैसा न म्हणे व्यापारा । रात्रदिवस ॥ १६९ ॥
काय चंचळु मासा ? । कामिनीकटाक्षु जैसा ।
लवलाहो तैसा । विजूही नाहीं ॥ १७० ॥
तेतुलेनि गा वेगें । स्वर्गसंसारपांगें ।
आगीमाजीं रिगे । क्रियांचिये ॥ १७१ ॥
ऐसा देहीं देहावेगळा । ले तृष्णेचिया सांखळा ।
खटाटोपु वाहे गळां । व्यापाराचा ॥ १७२ ॥
हें रजोगुणाचें दारुण । देहीं देहियासी बंधन ।
परिस आतां विंदाण । तमाचें तें ॥ १७३ ॥

तमस्त्वज्ञानजं विद्धि मोहनं सर्वदेहिनाम् ।
प्रमादालस्यनिद्राभिस्तन्निबध्नाति भारत ॥ ८॥

व्यवहाराचेहि डोळे । मंद जेणें पडळें ।
मोहरात्रीचें काळें । मेहुडें जें ॥ १७४ ॥
अज्ञानाचें जियालें । जया एका लागलें ।
जेणें विश्व भुललें । नाचत असे ॥ १७५ ॥
अविवेकमहामंत्र । जें मौढ्यमद्याचें पात्र ।
हें असो मोहनास्त्र । जीवांसि जें ॥ १७६ ॥
पार्था तें गा तम । रचूनि ऐसें वर्म ।
चौखुरी देहात्म- । मानियातें ॥ १७७ ॥
हें एकचि कीर शरीरीं । माजों लागे चराचरीं ।
आणि तेथ दुसरी । गोठी नाहीं ॥ १७८ ॥
सर्वेंद्रिया जाड्य । मनामाजीं मौढ्य ।
माल्हाती जे दार्ढ्य । आलस्याचें ॥ १७९ ॥

आंगें आंग मोडामोडी । कार्यजाती अनावडी ।
नुसती परवडी । जांभयांची ॥ १८० ॥
उघडियाची दिठी । देखणें नाहीं किरीटी ।
नाळवितांचि उठी । वो म्हणौनि ॥ १८१ ॥
पडलिये धोंडी । नेणे कानी मुरडी ।
तयाचि परी मुरकुंडी । उकलूं नेणें ॥ १८२ ॥
पृथ्वी पाताळीं जांवो । कां आकाशही वरी येवो ।
परी उठणें हा भावो । उपजों नेणें ॥ १८३ ॥
उचितानुचित आघवें । झांसुरता नाठवे जीवें ।
जेथींचा तेथ लोळावें । ऐसी मेधा ॥ १८४ ॥
उभऊनि करतळें । पडिघाये कपोळें ।
पायाचें शिरियाळें । मांडूं लागे ॥ १८५ ॥
आणि निद्रेविषयीं चांगु । जीवीं आथि लागु ।
झोंपीं जातां स्वर्गु । वावो म्हणे ॥ १८६ ॥
ब्रह्मायु होईजे । मा निजलेयाचि असिजे ।
हें वांचूनि दुजें । व्यसन नाहीं ॥ १८७ ॥
कां वाटें जातां वोघें । कल्हातांही डोळा लागे ।
अमृतही परी नेघे । जरी नीद आली ॥ १८८ ॥
तेवींचि आक्रोशबळें । व्यापारे कोणे एके वेळे ।
निगालें तरी आंधळें । रोषें जैसें ॥ १८९ ॥
केधवां कैसे राहाटावें । कोणेसीं काय बोलावें ।
हें ठाकतें कीं नागवें । हेंही नेणें ॥ १९० ॥
वणवा मियां आघवा । पांखें पुसोनि घेयावा ।
पतंगु पां हांवा । घाली जेवीं ॥ १९१ ॥
तैसा वळघे साहसा । अकरणींच धिंवसा ।
किंबहुना ऐसा । प्रमादु रुचे ॥ १९२ ॥
एवं निद्रालस्यप्रमादीं । तम इया त्रिबंधीं ।
बांधे निरुपाधी । चोखटातें ॥ १९३ ॥
जैसा वन्ही काष्ठीं भरे । तैं दिसे काष्ठाकारें ।
व्योम घटें आवरे । तें घटाकाश ॥ १९४ ॥
नाना सरोवर भरलें । तैं चंद्रत्व तेथें बिंबलें ।
तैसें गुणाभासीं बांधलें । आत्मत्व गमे ॥ १९५ ॥

सत्त्वं सुखे संजयति रजः कर्मणि भारत ।
ज्ञानमावृत्य तु तमः प्रमादे संजयत्युत ॥ ९॥
रजस्तमश्चाभिभूय सत्त्वं भवति भारत ।
रजः सत्त्वं तमश्चैव तमः सत्त्वं रजस्तथा ॥ १०॥

पैं हरूनि कफवात । जैं देही आटोपे पित्त ।
तैं करी संतप्त । देह जेवीं ॥ १९६ ॥
कां वरिष आतप जैसें । जिणौनि शीतचि दिसे ।
तेव्हां होय हिंव ऐसें । आकाश हें ॥ १९७ ॥
नाना स्वप्न जागृती । लोपूनि ये सुषुप्ती ।
तैं क्षणु एक चित्तवृत्ती । तेचि होय ॥ १९८ ॥

तैसीं रजतमें हारवी । जैं सत्त्व माजु मिरवी ।
तैं जीवाकरवीं म्हणवी । सुखिया ना मी ? ॥ १९९ ॥
तैसेंचि सत्त्व रज । लोपूनि तमाचें भोज ।
वळघें तैं सहज । प्रमादीं होय ॥ २०० ॥
तयाचि गा परिपाठीं । सत्त्व तमातें पोटीं ।
घालूनि जेव्हां उठी । रजोगुण ॥ २०१ ॥
तेव्हां कर्मावांचूनि कांहीं । आन गोमटें नाहीं ।
ऐसें मानी देहीं । देहराजु ॥ २०२ ॥
त्रिगुण वृद्धि निरूपण । तीं श्लोकीं सांगितलें जाण ।
आतां सत्त्वादि वृद्धिलक्षण । सादर परियेसीं ॥ २०३ ॥

सर्वद्वारेषु देहेऽस्मिन् प्रकाश उपजायते ।
ज्ञानं यदा तदा विद्याद्विवृद्धं सत्त्वमित्युत ॥ ११॥
लोभः प्रवृत्तिरारम्भः कर्मणामशमः स्पृहा ।
रजस्येतानि जायन्ते विवृद्धे भरतर्षभ ॥ १२॥
अप्रकाशोऽप्रवृत्तिश्च प्रमादो मोह एव च ।
तमस्येतानि जायन्ते विवृद्धे कुरुनन्दन ॥ १३॥
यदा सत्त्वे प्रवृद्धे तु प्रलयं याति देहभृत् ।
तदोत्तमविदां लोकानमलान् प्रतिपद्यते ॥ १४॥
रजसि प्रलयं गत्वा कर्मसंगिषु जायते ।
तथा प्रलीनस्तमसि मूढयोनिषु जायते ॥ १५॥

पैं रजतमविजयें । सत्त्व गा देहीं इयें ।
वाढतां चिन्हें तियें । ऐसीं होती ॥ २०४ ॥
जे प्रज्ञा आंतुलीकडे । न समाती बाहेरी वोसंडें ।
वसंतीं पद्मखंडें । द्दती जैसी ॥ २०५ ॥
सर्वेंद्रियांच्या आंगणीं । विवेक करी राबणी ।
साचचि करचरणीं । होती डोळे ॥ २०६ ॥
राजहंसापुढें । चांचूचें आगरडें ।
तोडी जेवीं झगडे । क्षीरनीराचे ॥ २०७ ॥
तेवीं दोषादोषविवेकीं । इंद्रियेंचि होती पारखीं ।
नियमु बा रे पायिकी । वोळगे तैं ॥ २०८ ॥
नाइकणें तें कानचि वाळी । न पहाणें तें दिठीचि गाळी ।
अवाच्य तें टाळी । जीभचि गा ॥ २०९ ॥
वाती पुढां जैसें । पळों लागे काळवसें ।
निषिद्ध इंद्रियां तैसें । समोर नोहे ॥ २१० ॥
धाराधरकाळें । महानदी उचंबळे ।
तैसी बुद्धि पघळे । शास्त्रजातीं ॥ २११ ॥
अगा पुनवेच्या दिवशीं । चंद्रप्रभा धांवे आकाशीं ।
ज्ञानीं वृत्ति तैसी । फांके सैंघ ॥ २१२ ॥
वासना एकवटे । प्रवृत्ति वोहटे ।
मानस विटे । विषयांवरी ॥ २१३ ॥
एवं सत्त्व वाढे । तैं हें चिन्ह फुडें ।
आणि निधनही घडे । तेव्हांचि जरी ॥ २१४ ॥

कां पाहालेनि सुयाणें । जालया परगुणें ।
पडियंतें पाहुणें । स्वर्गौनियां ॥ २१५ ॥
तरी जैसीचि घरींची संपत्ती । आणि तैसीचि औदार्यधैर्यवृत्ती ।
मा परत्रा आणि कीर्ती । कां नोहावें ? ॥ २१६ ॥
मग गोमटेया तया । जावळी असे धनंजया ।
तेवीं सत्त्वीं जाणे देहा । कें आथि गा ? ॥ २१७ ॥
जे स्वगुणीं उद्भट । घेऊनि सत्त्व चोखट ।
निगे सांडूनि कोपट । भोगक्षम हें ॥ २१८ ॥
अवचटें ऐसा जो जाये । तो सत्त्वाचाचि नवा होये ।
किंबहुना जन्म लाहे । ज्ञानियांमाजीं ॥ २१९ ॥
सांग पां धनुर्धरा । रावो रायपणें डोंगरा ।
गेलिया अपुरा । होय काई ? ॥ २२० ॥
नातरी येथिंचा दिवा । नेलिया सेजिया गांवा ।
तो तेथें तरी पांडवा । दीपचि कीं ॥ २२१ ॥
तैसी ते सत्त्वशुद्धी । आगळी ज्ञानेंसी वृद्धी ।
तरंगावों लागे बुद्धी । विवेकावरी ॥ २२२ ॥
पैं महदादि परिपाठीं । विचारूनि शेवटीं ।
विचारासकट पोटीं । जिरोनि जाय ॥ २२३ ॥
छत्तिसां सदतिसावें । चोविसां पंचविसावें ।
तिन्ही नुरोनि स्वभावें । चतुर्थ जें ॥ २२४ ॥
ऐसें सर्व जें सर्वोत्तम । जालें असे जया सुगम ।
तयासवें निरुपम । लाहे देह ॥ २२५ ॥
इयाचि परी देख । तमसत्त्व अधोमुख ।
बैसोनि जैं आगळीक । धरी रज ॥ २२६ ॥
आपलिया कार्याचा । धुमाड गांवीं देहाचा ।
माजवी तैं चिन्हांचा । उदयो ऐसा ॥ २२७ ॥
पांजरली वाहुटळी । करी वेगळ वेंटाळी ।
तैसी विषयीं सरळी । इंद्रियां होय ॥ २२८ ॥
परदारादि पडे । परी विरुद्ध ऐसें नावडे ।
मग शेळियेचेनि तोंडें । सैंघ चारी ॥ २२९ ॥
हा ठायवरी लोभु । करी स्वैरत्वाचा राबु ।
वेंटाळितां अलाभु । तें तें उरे ॥ २३० ॥
आणि आड पडलिया । उद्यमजाती भलतिया ।
प्रवृत्ती धनंजया । हातु न काढी ॥ २३१ ॥
तेवींचि एखादा प्रासादु । कां करावा अश्वमेधु ।
ऐसा अचाट छंदु । घेऊनि उठी ॥ २३२ ॥
नगरेंचि रचावीं । जळाशयें निर्मावीं ।
महावनें लावावीं । नानाविधें ॥ २३३ ॥
ऐसैसां अफाटीं कर्मीं । समारंभु उपक्रमीं ।
आणि दृष्टादृष्ट कामीं । पुरे न म्हणे ॥ २३४ ॥
सागरुही सांडीं पडे । आगी न लाहे तीन कवडे ।
ऐसें अभिलषीं जोडे । दुर्भरत्व ॥ २३५ ॥
स्पृहा मना पुढां पुढां । आशेचा घे दवडा ।
विश्व घापे चाडा । पायांतळीं ॥ २३६ ॥
इत्यादि वाढतां रजीं । इयें चिन्हें होतीं साजीं ।

